**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन ज्ञापन क्र. पोप्रमा-१२१६/प्र.क्र.८१८/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १९ जून, २०१७.

**विषय** :- उप-पोलीस ठाणे, पेंढरी, तालुका-धानोरा, जिल्हा-गडचिरोली येथे पोलीस कर्मचाऱ्यांसाठी प्रकार-२ ची आठ शासकीय निवासस्थाने यांचे बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१./प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस अधीक्षक, कार्यालय गडचिरोली, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.सि.बी.-२/ उप-पोस्टे-पेंढरी/ प्रशा.मा./ ८६६/ २०१६, दिनांक ०३.१२.२०१६.

**ज्ञापन:-**

पोलीस अधीक्षक, गडचिरोली, यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्राद्वारे पोलीस ठाणे, पेंढरी, ता. धानोरा, जि. गडचिरोली येथे पोलीस कर्मचाऱ्यांसाठी प्रकार-२ ची आठ शासकीय निवासस्थाने यांचे बांधकाम करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी उप-विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग, धानोरा, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.१,५३,११,०००/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे खर्चाचे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, गडचिरोली आणि अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, गडचिरोली, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.१८५.७५ लाख** असे सुधारित केले आहेत व त्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे. त्या अनुसार, पोलीस ठाणे, पेंढरी, ता. धानोरा, जि. गडचिरोली येथे पोलीस कर्मचाऱ्यांसाठी प्रकार-२ ची आठ शासकीय निवासस्थाने यांचे बांधकाम करण्यासाठी **रु.१८५.७५ लाख** इतक्या खर्चाच्या अंदाजास, याद्वारे, पुढील अटींवर, मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) निधी उपलब्ध झाल्याशिवाय बांधकामास सुरवात करु नये.

२) बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुविशारदाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

३) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

४) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत विस्तृत खर्चाचे अंदाज मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

५) बांधकाम करताना, शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४, यामधील तरतूदींचे अनुपालन करण्यात यावे.

४. ही मान्यता, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच, मधील अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४, अनुसार प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागास प्राप्त असलेल्या अधिकाराचा वापर करत, प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग, मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८००, इतर खर्च, (००)(०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे (योजनांतर्गत) (४०७० ०१५१), ५३, मोठी बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५६६/इमा-२, दिनांक ३१.१२.२०१६, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०६२०१६५३५८८८२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.06.20 16:51:35 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस उप-महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, गडचिरोली.
४) पोलीस अधीक्षक, गडचिरोली.
५) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, गडचिरोली.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, गडचिरोली.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
९) निवड फाईल (पोल-७).